एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम
वित्तिय वर्ष २०१७-१८- वनामती, नागपूर
यांना अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-०४१७/प्र.क्र.५४/सीपीटीपी-ब**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०३ मे, २०१७.

वाचा : १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३, दिनांक ०१.०४.२०१७
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : बीयुडी-२०१४/प्र.क्र.७०/ २०१७/२५, दि. ५ एप्रिल, २०१७.

**शासन निर्णय** :-

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २० जानेवारी,२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट अ व ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेला सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाच्या खर्चासाठी वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये **रु. ७३५.०१ लाख (रुपये सात कोटी पस्तीस लक्ष एक हजार फक्त)** इतकी तरतूद करण्यात आलेली आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील परिपत्रकातील सूचनांनुसार सन २०१७-१८ मधील माहे एप्रिल,२०१७ ते मे, २०१७ या दोन महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BEAMS) रुपये १२२.५० लक्ष अनुदानाचे वाटप करण्यात आहे. त्यानुसार माहे एप्रिल, २०१७ व मे, २०१७ करीता आवश्यक असणारा योजनेतर अर्थसंकल्पीत निधी एकुण वार्षिक तरतुदीच्या १६.६७ % मर्यादेत वितरित करण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आला आहे.

३. आता वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेच्या मागणीनुसार संस्थेतील संशोधन सहायक या नियमित पदावर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्याच्या माहे एप्रिल,२०१७ ते मे, २०१७ या २ महिन्यांच्या वेतनाकरीता रु. ४३,०००/-प्रति महिना याप्रमाणे एकुण रु. ८६,०००/- इतके वेतन अनुदान लेखाशीर्ष ए-४-२०७० इतर प्रशासकीय सेवा ००-००३-प्रशिक्षण ((००)(११) वनामती, नागपूर या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७००८६२) या लेखाशिर्षाखाली -३६, सहायक अनुदान (वेतन) या उपशिर्षाअंतर्गत रु. ८६,०००/- (अक्षरी रुपये शहाऐंशी हजार फक्त) वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे -

| अ.क्र. | प्रशिक्षण संस्थेचे नाव | उपशीर्ष | अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीतून वितरीत करावयाची तरतूद (रुपये) |
|---|---|---|---|
| १. | वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर | (००)(११) वनामती, नागपूर या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७००८६२) ३१, सहायक अनुदान - (वेतनेतर) | -- |
| | | ३६. सहायक अनुदान (वेतन) | रुपये ८६,०००/- |
| | | **एकुण वितरीत करावयाचे अनुदान** | **रुपये ८६,०००/-** |

४. वनामती, नागपूर या संस्थेने माहे एप्रिल, २०१७ व मे, २०१७ या दोन महिन्यांचा खर्च वितरीत अनुदानाच्या मर्यादेत ठेवावा.

५. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा खर्च ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

६. वनामती, नागपूर या संस्थेने वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर व शासनाला सादर करावे.

७. वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावे व सदर लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर यांना राहतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५२२११२५१९०७०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3d2bd4ed83b4c722151f75f40dad09e69527159e04d26476bbf5363e7b1c3cb2, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2017.05.22 11:33:47 +05'30'

**(अजित देशमुख)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई,
२. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२,नागपूर,
३. प्र.स.(सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
४. संचालक, वनामती, नागपूर,
५. वरिष्ठ प्रशासनिक व लेखाधिकारी, वनामती, नागपूर (२ जादा प्रतींसह),
६. सहसंचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई,
७. जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर
८. उप कोषागार कार्यालय, नागपूर
९. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्र. २५, मुंबई-३२.
११. निवड नस्ती.

*********